“महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP)” या योजनेअंतर्गत औद्योगिक समूह प्रकल्पांकरीता क्षमतावृद्धी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी प्रथम टप्प्यातील अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२३/ प्र.क्र.१३९/ उद्योग-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक ०३/०८/२०२३

**संदर्भ**:- १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१३/ प्र.क्र.२०७/ उद्योग-७, दिनांक २५/०२/२०१४.
२. उद्योग उप संचालक (औसशा), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ औसशा/ एमएसआयसीडीपी/ अनुदान वितरण/ २०२३/ अे-७४७, दिनांक १३/०६/२०२३.

**प्रस्तावना:-**

राज्यातील औद्योगिकदृष्ट्या अविकसित क्षेत्रातील छोट्या समूहांचा समूह विकास होऊन त्याद्वारे सूक्ष्म व लघु घटकांच्या सर्वांगिण विकासास चालना मिळणेसाठी “महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)” ही योजना दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत सूक्ष्म व लघु उपक्रमाच्या सर्वांगिण विकास व वाढीकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी तसेच सामायिक सुविधा उभारणीसाठी राज्य शासनाचे अनुदान देण्यात येते. या योजनेंतर्गत औद्योगिक समूहाच्या उत्पादन प्रक्रियेमधील त्रुटी, कमतरता यांचे योग्य निदान करून अद्ययावत तंत्रज्ञान, बाजारपेठ विस्तारीकरण, विविध यशस्वी औद्योगिक समूहांना भेटी, अद्ययावत प्रशिक्षण कार्यक्रम व अभ्यास दौरे इत्यादीचा समावेश असलेला निदानोपयोगी अभ्यास अहवाल (DSR) तयार करण्यात येतो. सदर निदानोपयोगी अभ्यास अहवाल जिल्हास्तरीय समितीच्या शिफारशीनंतर प्राप्त झाल्यानंतर राज्यस्तरीय औद्योगिक समूह संनियंत्रण समितीमार्फत निदानोपयोगी अभ्यास अहवाल प्रस्तावांस मंजूरी देणे व त्या अंतर्गत क्षमतावृध्दी कार्यक्रमास अनुदान निश्चिती करणे इत्यादी बाबी केल्या जातात. क्षमतावृद्धी कार्यक्रमासाठीचे अनुदान दोन टप्प्यात वितरीत करण्यात येते. शासनाकडून वितरीत करावयाचे प्रथम टप्प्यातील ६०% अनुदान हे भागधारकांचे आवश्यक असणारे १०% सहभाग जमा झाल्याची खात्री पटल्यानंतर वितरीत करण्यात येते. उर्वरीत ४०% अनुदान हे प्रथम टप्प्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर वितरीत केले जाते. त्यानुसार उद्योग संचालनालयाकडून दिनांक १३/०६/२०२३ च्या पत्रान्वये ०८ औद्योगिक समूह प्रकल्पांच्या क्षमतावृध्दी कार्यक्रमाकरीता आवश्यक राज्य शासनाच्या हिश्श्यातील प्रथम टप्प्यातील रुपये ३३.७० लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य शासनाच्या “महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP)” या योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त ०८ औद्योगिक समूह प्रकल्पांकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रमासाठी राज्य शासनाचे प्रथम टप्प्यातील अनुदान रुपये ३३.७० लक्ष वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव उद्योग संचालनालयाने संदर्भ क्र. २ येथील दिनांक १३/०६/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे. त्यानुषंगाने, प्रस्तुत योजनेतील तरतूदीनुसार, पुढीलप्रमाणे नमूद तक्त्यातील ०८ औद्योगिक समूह प्रकल्पांकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रमासाठी शासनाचे प्रथम टप्प्यातील रुपये ३३.७० लक्ष (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष सत्तर हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम रुपये लक्ष)**

| अ. क्र. | औद्योगिक समूहाचे नाव व ठिकाण | प्रकल्प मंजूरी तपशिल | | | शासनाकडून वितरीत करावयाचे प्रथम टप्प्यातील अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| | | एकूण | राज्य शासन अनुदान | SPV सहभाग | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ॲग्रीकल्चर इक्विपमेंट अँड फॅब्रिकेशन क्लस्टर, नेवासा जि. अहमदनगर | ६.८० | ६.१२ | ०.६८ | ३.६७ |
| २ | ॲल्युमिनिअम क्लस्टर, संगमनेर जि. अहमदनगर | ६.०० | ५.४० | ०.६० | ३.२४ |
| ३ | मॉड्युलर फर्निचर क्लस्टर, उदगीर जि. लातूर | ९.४० | ८.४६ | ०.९४ | ५.०७ |
| ४ | पैठणी कलाकारी क्लस्टर, येवला जि. नाशिक | ९.४० | ८.४६ | ०.९४ | ५.०८ |
| ५ | पॅकेजिंग क्लस्टर, सातारा | ९.९० | ८.९१ | ०.९९ | ५.३५ |
| ६ | स्पायसेस क्लस्टर, मंगळवेढा जि. सोलापूर | ७.४० | ६.६६ | ०.७४ | ४.०० |
| ७ | वणी जिनिंग अँड प्रेसिंग क्लस्टर, जि. यवतमाळ | ७.४० | ६.६६ | ०.७४ | ४.०० |
| ८ | उमरखेड फर्निचर क्लस्टर, जि. यवतमाळ | ६.१० | ५.४९ | ०.६१ | ३.२९ |
| | | | | **एकूण** | **३३.७०** |

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी रुपये ३३,७०,०००/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष सत्तर हजार फक्त) ही रक्कम शासकीय कोषागारातून काढून उपरोक्त नमूद तक्त्यामधील ०८ औद्योगिक समूह प्रकल्पांच्या क्षमतावृध्दी कार्यक्रमासाठी देण्याची व्यवस्था करावी. उपरोक्त नमूद रुपये ३३,७०,०००/- ही रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ व त्यासोबतचे परिशिष्ठामध्ये नमूद तरतूदी तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

i. "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम" या योजनेचा शासन निर्णय दिनांक २५/०२/२०१४ रोजी निगर्मित केला असून यामध्ये योजनेचा कालावधी, अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण, विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे.

ii. सदर योजनेंतर्गत यापूर्वी वितरीत ७५% पेक्षा जास्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आले आहेत. तसेच उक्त नमूद ०८ प्रकल्पांना क्षमतावृध्दी कार्यक्रमाकरीता प्रथमच राज्य शासनाचे अनुदान वितरीत करण्यात येणार असल्याने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे ही बाब लागू होत नाही.

iii. सदर प्रकल्पास यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाबाबत लेखा परिक्षकांकडून कोणतेही आक्षेप उपस्थित करण्यात आलेले नाहीत.

iv. निधी मंजूरीप्राप्त प्रकल्पाच्या प्राधिकृत बँक खात्यामध्ये थेट जमा होणार आहे.

४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर समूह प्रकल्पांच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय भागभांडवलाच्या सुयोग्य वापरावर व विनियोगावर देखरेख ठेवण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. सदर योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघू उद्योग, ०० १०२ लघूउद्योग-राज्य योजनांतर्गत योजना (००) (२४) महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP) (२८५१ ६३७८), ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ व त्यासोबतच्या परिशिष्टामधील प्रत्येक अटीची पूर्तता होत असल्याने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०८०३११३०३४२९१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2024.01.03 13:35:09 +05'30'

**(राजीव राजमाने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (मूळ शाईच्या पाच प्रती)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/ २, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
६) उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय, पुणे/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती. (उद्योग संचालनालयामार्फत)
७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर/ लातूर/नाशिक/सातारा/सोलापूर/यवतमाळ. (उद्योग संचालनालयामार्फत)
८) संबंधित उद्योग समूह. (उद्योग संचालनालयामार्फत)
९) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) अवर सचिव (कार्यासन प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती (कार्यासन उद्योग-७).